**वैनगंगा-नळगंगा नदीजोड प्रकल्पास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. नजोयो-२०२३ /( ७३ /२३ )/जसंअ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :**
१) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण-२०१४/(९६/१४)/जसं (आस्था), दि.२३.११.२०१६.
२) शासन पत्र क्र. नजोयो-२०२३/(६३/२०२३) /जसंअ, दि.३०.०५.२०२३.
३) अधीक्षक अभियंता तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-१ नाशिक यांचे पत्र क्र. जा.क्र. /रातांसस १/वैनगंगा-नळगंगा/(धा.क्र.४२/२०२३)/१०१७, दि. ०७.१२.२०२३.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण-२०२३/(६३/२०२३)/जसंअ दि. ०६.०२.२०२४.
५) मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव यांचे दि. १०.०७.२०२४ रोजीचे पत्र.
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र जा. पत्र क्र.४७३१/विपाविम/कातां-५(१)/वैनगंगा-नळगंगानदीजोड/२०२४ दि. १८.०७.२०२४.
७) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांचे पत्र पत्र क्र.MWRRA/ २०२३ / PRCL/VIDC/१३८/४२० , दि.१९.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

वैनगंगा-नळगंगा नदीजोड प्रकल्प हा राज्यस्तरीय नदीजोड प्रकल्प प्रस्तावित असून या प्रकल्पाव्दारे वैनगंगा नदीवरील भंडारा जिल्हयातील गोसीखुर्द प्रकल्पात पावसाळ्यात उपलब्ध होणारे पाणी वैनगंगा उपखोऱ्यातून तापी खोऱ्यातील बुलढाणा जिल्हयातील नळगंगा प्रकल्पापर्यंत नदीजोड कालव्याद्वारे वळविणे प्रस्तावित आहे. सदर जोड कालव्याची एकूण लांबी ४२६.५२ किमी असून या कालव्याव्दारे विदर्भ प्रदेशातील ६ जिल्हयातील (नागपूर, वर्धा, अमरावती, यवतमाळ, अकोला, बुलढाणा) १५ तालुक्यांतील एकुण ३,७१,२७७ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. तसेच पिण्याच्या पाण्यासाठी व औद्योगिक वापरासाठी सदर पाण्याचा उपयोग करण्याचे नियोजित आहे.

गोदावरी पाणी तंटा लवादाने “The State of Maharashtra can use all waters of the river Wainganga and all its tributaries upto the following points

1. Gosikhurd project site on the Wainganga river near Gosikhurd village”.

असे स्पष्ट केले आहे. त्यामुळे गोसीखुर्द प्रकल्प स्थळी उपलब्ध पाण्याचा पुर्ण वापर करण्यासाठी ६३ टक्के विश्वासार्हतेने १७७२ दलघमी पाणी वापरास मा. मंत्री मंडळाने मान्यता दिली आहे.

या योजनेच्या जोड कालव्यावर सहा ठिकाणी उपसा प्रस्तावित आहे. शासकीय खर्चाने मोठया उपसा सिंचन योजना हाती घेण्यासाठी शासन निर्णय दि. २३.११.२०१६ मधील तरतुदीनुसार मा.मुख्यमंत्री महोदयांनी सदर योजना हाती घेण्यास मान्यता दिली आहे.

दि. २८.०६.२०२४ रोजी झालेल्या राज्य जल परिषदेच्या ८ व्या बैठकीमध्ये मान्यता मिळाल्यानुसार सदर प्रकल्पाचा समावेश एकात्मिक राज्य जल आराखडयामध्ये करण्यात आला आहे.

वैनगंगा -नळगंगा नदीजोड योजनेच्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास मा.राज्यपाल कार्यालयाचे पत्र दि १०.०७.२०२४ अन्वये तत्वत: मान्यता प्राप्त झालेली आहे.

या योजनेच्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र दि.१९.०७.२०२४ अन्वये भाग १ ची कामे हाती घेण्याकरीता प्रशासकीय मान्यता प्राप्त करण्याच्या अनुषंगाने तत्वत: मान्यता प्राप्त झाली आहे.

वैनगंगा -नळगंगा नदीजोड प्रकल्प विदर्भ वासियांसाठी महत्वाकांक्षी प्रकल्प असून या प्रकल्पामुळे विदर्भातील निर्मित सिंचन क्षमता टक्केवारी वाढण्यास मदत होणार आहे.

संदर्भीय पत्र क्र. ३ अन्वये राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने प्रस्तावाची छाननी करुन त्यातील मुद्दा क्र. २७ च्या अधिन राहुन प्रकल्पास शिफारस केली आहे. त्यानुसार कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी राज्य तांत्रिक सल्लागार समितीने उपस्थित केलेल्या मुद्यांचे अनुपालन अहवालासह प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने योजनेच्या प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावित वैनगंगा-नळगंगा नदीजोड प्रकल्पास मान्यतेकरीता व पुर्ण करण्याच्या दृष्टीने दोन भागात विभागले असून त्यानूसार खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**भाग १**

या प्रकल्पाचे प्रत्यक्ष बांधकाम हाती घेण्यापुर्वी, भाग १ अंतर्गत खालील कामांसाठी तरतुद करण्यात आली आहे.

१. प्रकल्पांतर्गत नवीन मार्गस्थ साठा स्थळांचे आवश्यक सर्वेक्षण, अन्वेषण व संकल्पन

२.मुख्य कालव्यास जोडणारे शाखा कालवे,फिडर कालवे, त्यावरील बांधकामांचे सर्वेक्षण अन्वेषण व संकल्पन

३.मार्गस्थ साठा स्थळांसाठी असलेला कालवा / उपकालवा इत्यादीचे संरेखा मार्गाचे सर्वेक्षण तसेच समादेश क्षेत्राचे सर्वेक्षण, अन्वेषण व संकल्पन इ.

४. प्रकल्पासाठी आवश्यक सर्व वैधानिक मान्यता.

५. प्रकल्पांतर्गत संपूर्ण वनजमीन संपादन.

प्रकल्पातंर्गत वाशिम जिल्हा तसेच नळगंगा ते पेनगंगा यांचा देखील सर्वेक्षणामध्ये

समावेश करण्यात यावा.

वैनगंगा नळगंगा नदीजोड योजनेचे प्रत्यक्ष बांधकाम हाती घेण्यापूर्वी सविस्तर सर्वेक्षण, अन्वेषण व संकल्पन तसेच आवश्यक असलेल्या सर्व प्रकारच्या वैधानिक मान्यता ( उदा. पर्यावरण विषयक मान्यता, वन्यजीव (संरक्षण) अधिनियमानुसार अपेक्षित असलेली मान्यता इत्यादी) तसेच वनजमीन संपादन करण्यासाठी प्रकल्पाच्या भाग १ मधील कामाकरीता रु.१२३२.०६ कोटी (एक हजार दोनशे बत्तीस कोटी सहा लक्ष रुपये फक्त) रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**भाग २**

वैनगंगा नळगंगा नदीजोड प्रकल्पातील बांधकाम घटकाच्या रु.८७३४२.८६ कोटी (सत्त्याऐंशी हजार तीनशे बेचाळीस कोटी शहाऐंशी लक्ष रुपये फक्त) इतक्या किमतीस तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदरील मान्यता खालील अटींच्या आधीन राहून देण्यात येत आहे.

१. प्रकल्पाचे सविस्तर सर्वेक्षण, अन्वेषण व संकल्पन तसेच प्रचलित नियमानुसार आवश्यक असलेल्या सर्व वैधानिक मान्यता प्राप्त केल्याखेरीज प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यात येऊ नये.

२. भाग - १ ची सर्व कामे पूर्ण झाल्यानंतर भाग - २ अंतर्गत बांधकाम घटकाची कामे हाती घेण्यापूर्वी भाग- २ मधील कामास महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता प्राप्त करुन पुन:श्च प्रशासकीय मान्यता घेणे अनिवार्य राहील.

३. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

४. सर्व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.

५. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील सूचनांची पूर्तता झाल्याची खातरजमा करण्यात यावी.

६. प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहित धरली जाणार नाही. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करू नये.

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा परिशिष्ट-१ मध्ये सोबत जोडला आहे.

सदर योजनेसाठीचा खर्च "४७००- मोठे पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका, (०२) योजनांतर्गत (०२)(०३) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान(विदर्भ प्रदेश)(कार्यक्रम),५४ गुंतवणूका (४७०० ०१०२)"या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३१/२०२४ दि.३०.०७.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२१/२०२४ दि.०१.०८.२०२४

अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०७.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०८२०१५५९५६६६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.20 16:15:20 +05'30'

**( न. गौ. बसेर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) यांचे प्रधान सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव.
५. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
८. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
९. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.सचिव (प्रस), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११.सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१३.मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक
१४.आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५.जसंअ कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्र. नजोयो २०२३/(७३/२३)/जसंअ दि. २०.०८.२०२४ सोबतचे परिशिष्ट
## वैनगंगा-नळगंगा नदीजोड प्रकल्प
## परिशिष्ट १

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा

(Cost in Cr)

| Sr. No | Sub Head | Estimated cost of part -I | Estimated cost of part - II | Total Estimated cost |
|---|---|---|---|---|
| 1 | A-Preliminary | 597.74 | 638.29 | 1236.03 |
| 2 | B-Land | 550.74 | 12534.14 | 13084.88 |
| 3 | C-Works | - | 24141.74 | 24141.74 |
| 4 | D-Regulator | - | 66.59 | 66.59 |
| 5 | E-Falls | - | 2.48 | 2.48 |
| 6 | F- RHT Works | - | 1382.18 | 1382.18 |
| 7 | G-Bridges | - | 302.10 | 302.10 |
| 8 | H-Escape | - | 25.84 | 25.84 |
| 9 | K-Building | - | 2312.11 | 2312.11 |
| 10 | L-Earthwork | - | 15379.99 | 15379.99 |
| 11 | M-Plantation | - | 6.56 | 6.56 |
| 12 | O-Miscellaneous | - | 59.22 | 59.22 |
| 13 | P-Maintenanace | - | 517.11 | 517.11 |
| 14 | Q-Special T & P | - | 0.00 | 0.00 |
| 15 | R-Communication | - | 37.69 | 37.69 |
| 16 | U-distributary | - | 11310.36 | 11310.36 |
| 17 | x-Environment | 83.58 | 266.64 | 350.22 |
| 18 | Y-Losses | - | 138.28 | 138.28 |
| **18** | **Sub Total -1** | **1232.06** | **69121.32** | **70353.38** |
| 19 | Direct Charges | - | 14224.78 | 14224.78 |
| 20 | Recoveries | - | -285.82 | -285.82 |
| 21 | Indirect Charges | - | 1357.77 | 1357.77 |
| **22** | **Total Cost of Project (18+19+20+21)** | **1232.06** | **84418.05** | **85650.11** |
| 23 | Estimated cost of III- CAD Works (In Cr) | - | 1299.47 | 1299.47 |
| 24 | Royalty | - | 1625.34 | 1625.34 |
| | **Total Amount** | **1232.06** | **87342.86** | **88574.92** |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.20 16:15:47 +05'30'

( न. गौ. बसेर )

उप सचिव, महाराष्ट्र शासन